कार्यकंत्राट कर व भाडे करार
थकबाकीदारांसाठी कर, शास्ती आणि व्याज
विषयक अभय योजना

=======================================

**महाराष्ट्र शासन,**
वित्त विभाग,

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. एसटीए-१९९८/सीआर-५४/कराधान-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - २५.नोव्हेंबर,१९९८

<u>प्रस्तावना</u> :-

महाराष्ट्र शासनाने कार्यकंत्राट विक्रीकर अधिनियम १९८५ व भाडे करार कर अधिनियम १९८५ हे १.१०.१९८६ पासून अंमलात आणले. कार्यकंत्राट कर अधिनियमातील कर आकारणीच्या काही तरतुदींबद्दल संभ्रम होता. मे. बिल्डर्स असोसिएशन ऑफ इंडिया व इतर या प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाच्या दि. ११.१.८९ च्या निर्णयानंतर राज्य शासनाने सन १९८५ च्या कार्यकंत्राट कर अधिनियमाच्या आधारे आणि पुनर्विचार करून ऑक्टोबर १९८९ मध्ये सुधारित कार्यकंत्राट विक्रीकर कायदा, १ ऑक्टोबर १९८६ पासून पूर्वलक्षी प्रभावाने अंमलात आणला. कार्यकंत्राट व भाडेकरार कर अधिनियमाखालील निर्धारणा व वसूलीमध्ये दिसून येणाऱ्या अडचणी, प्रलंबित निर्धारणा असणाऱ्या प्रकरणांची वाढती संख्या व अनोंदित करदात्यांचे मोठे प्रमाण व या गोष्टींच्या अनुरोधाने शासनाकडे प्राप्त झालेली निवेदने या सर्व गोष्टींचा विचार करून मा. वित्त मंत्र्यांनी १९९६-९७ चा अर्थसंकल्प सादर करताना कार्यकंत्राट कर अधिनियम व भाडेकरार कर अधिनियम यांच्या योग्य अंमलबजावणीसाठी एक अभय योजना जाहिर करण्यात येईल असे म्हटले होते.

या अनुषंगाने शासनाने राज्यातील कार्यकंत्राट कर अधिनियम आणि भाडेकरार कर अधिनियम लागू होणाऱ्या करदात्यांच्या बाबतीत कर, शास्ती आणि व्याज विषयक अभय योजना लागू करण्याचे योजिले आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

१) <u>अभय योजनेचा कालावधी</u> :- कर, शास्ती आणि व्याज विषयक अभय योजना दिनांक १ डिसेंबर १९९८ ते दिनांक ३० जून, १९९९ या कालावधीमध्ये खुली असेल.

२) <u>अभय योजनेचा लाभ घेण्याकरिता निश्चित केलेला निर्धारणा कालावधी</u> :- दि. ३१ मार्च १९९८ पर्यंत संपणाऱ्या सर्व निर्धारणा कालावधीसाठी अभय योजनेचा लाभ घेता येईल. करदात्याच्या इच्छेप्रमाणे त्याला एक किंवा एकाहून जास्त निर्धारणा कालावधीसाठी असा लाभ घेता येईल.

३) <u>लाभ मिळण्यासाठी पात्र असलेली थकबाकी किंवा मागणी</u> :-

अ) १ डिसेंबर १९९८ अगोदर निर्धारणा पूर्ण झालेल्या कालावधीसाठी कर, शास्ती, किंवा व्याज यांची जी थकबाकी १ डिसेंबर १९९८ रोजी असेल त्या थकबाकीकरिता योजनेचा लाभ घेता येईल. तसेच, -

ब) अभय योजना कालावधीमध्ये निर्धारणा पूर्ण केलेल्या कालावधीकरिता कराची, शास्तीची, किंवा व्याजाची जर मागणी करण्यात आली तर त्या मागणीकरिता देखील योजनेचा लाभ मिळू शकेल.

टिप :-

१. प्रत्येक निर्धारणा कालावधीसाठी कर, शास्ती किंवा व्याज ह्यांची थकबाकी किंवा जादा मागणीची रक्कम, करदात्यास कोणत्याही कालावधीसाठी परतावा मिळणार असेल तर, त्या परताव्याच्या रकमेचे समायोजन करून नंतर, योजनेसाठी पात्र असलेल्या थकबाकी किंवा मागणीची रक्कम ठरविण्यात येईल. समायोजन करताना परताव्याची रक्कम कालानुक्रमाप्रमाणे वेगवेगळ्या कालावधीसाठीच्या कराच्या मागणीसाठी समायोजित केली जाईल. जर काही रक्कम उरली तर ती त्याच क्रमाने प्रथम व्याजाच्या मागणीसाठी व उर्वरित रक्कम त्याच क्रमाने शास्तीच्या मागणीसाठी समायोजित केली जाईल.

२. कुठल्याही परिस्थितीत अभय योजनेमुळे १ डिसेंबर १९९८ पूर्वी भरलेला कर, कोणत्याही तडजोड योजनेखाली भरलेला कर, तसेच शास्ती किंवा व्याज यांची भरलेली रक्कम किंवा समायोजित केलेली रक्कम यांचा परतावा मिळणार नाही.

३. कोणत्याही कालावधीसाठी केवळ करविषयक किंवा केवळ व्याजविषयक तसेच केवळ शास्तीविषयक असा लाभ घेता येणार नाही. त्या कालावधीसाठी कर, व्याज व शास्ती यांची जी थकबाकी किंवा मागणी असेल त्या सर्व थकबाकीसाठी किंवा मागणीसाठी लाभ घ्यावा लागेल. योजने प्रमाणे जी रक्कम भरावयाची असेल ती पूर्ण भरली तरच योजनेचा लाभ मिळेल. अंशतः केलेल्या भरण्यावर कोणताच लाभ मिळणार नाही.

४) अभय योजने अंतर्गत मिळणाऱ्या सवलती. :-

अ. कर सवलत :- (फक्त कार्यकंत्राट कर अधिनियमासाठी)

करदात्याकडे वैधानिक आदेशाप्रमाणे कराची थकबाकी शिल्लक असल्यास किंवा वैधानिक आदेशाप्रमाणे मागणी निर्माण झाली असल्यास अभय योजनेकरीता करदात्याचे दायित्व खालीलप्रमाणे ठरविण्यात येईल.

१. महाराष्ट्र शासनाच्या विभागांनी दिलेली कंत्राटे. :- पूर्ण करमाफी.

२. ४(अ)(१) मध्ये न येणारी कंत्राटे. -

अ) बांधकाम कार्यकंत्राटे. :- कार्यकंत्राटाच्या संपूर्ण रकमेच्या १ टक्का इतकी रक्कम भरावी लागेल व कराची उर्वरित थकबाकी किंवा मागणी माफ होईल.

ब) इतर कोणत्याही प्रकारची कार्यकंत्राटे. :- कार्यकंत्राटाच्या संपूर्ण रकमेच्या २ टक्के इतकी रक्कम भरावी लागेल व कराची उर्वरित थकबाकी किंवा मागणी माफ होईल.

१ डिसेंबर १९९८ रोजी जी कराची थकबाकी असेल त्यापैकी खालीलप्रमाणे रक्कम भरली तर योजनेप्रमाणे उर्वरित थकबाकीसाठी माफी मिळेल.

१ डिसेंबर १९९८ रोजीची कर थकबाकी X योजनेप्रमाणे कॉन्ट्रॅक्ट किंमतीची टक्केवारी म्हणून भरावयाची रक्कम.

---

त्या कालावधीसाठी अधिनियमाप्रमाणे देय असलेला कर.

इतकी रक्कम भरल्यानंतर कराची शिल्लक थकबाकी माफ होईल.

ब. <u>शास्ती विषयक सवलत</u> :-

कार्यकंत्राट कर व भाडेकरार कर अधिनियमाप्रमाणे लावण्यात आलेल्या शास्तीच्या थकबाकी व मागणीबाबत खालीलप्रमाणे सवलत देण्यात येईल.

| | |
|---|---|
| १) ४ (अ) मधील मुद्दा क्रमांक (१) व (२) अंतर्गत १.४.९८ पूर्वी संपणाऱ्या निर्धारणा कालावधीच्या बाबतीत लावण्यात आलेली शास्ती. | पूर्ण माफी. |

क. <u>व्याज विषयक सवलत</u> :-

कार्यकंत्राट कर व भाडेकरार कर या दोन्ही अधिनियमाप्रमाणे लागू होणाऱ्या व्याजाच्या थकबाकी व मागणीबाबत खालीलप्रमाणे सवलत देण्यात येईल. (यामध्ये निर्धारणोत्तर तसेच निर्धारणपूर्व व्याजाचा समावेश आहे.)

| | |
|---|---|
| १) ४ (अ) मधील मुद्दा क्रमांक (१) मध्ये अंतर्भूत असलेल्या करावर लावण्यात आलेले व्याज. | पूर्ण माफी. |
| २) इतर प्रकरणामध्ये १.४.९२ पूर्वी संपणाऱ्या निर्धारणा निर्धारणा कालावधीसाठी. | व्याजविषयक जी रक्कम आकारली असेल त्याच्या ८५ टक्के रक्कम माफ होईल व उर्वरित रक्कम भरावी लागेल. |
| ३) १.४.९२ रोजी किंवा नंतर चालू होणाऱ्या निर्धारणा कालावधीसाठी. | व्याजविषयक जी रक्कम आकारली असेल त्याच्या ७० टक्के रक्कम माफ होईल व उर्वरित रक्कम भरावी लागेल. |

५) <u>अभय योजनेच्या अटी</u> :-

१) अभय योजनेचा लाभ सर्व नोंदीत कंत्राटदारांना मिळेल. करदाता अनोंदीत असून १ डिसेंबर १९९८ पूर्वी धंदा बंद झाला असेल तरी योजनेचा लाभ घेता येईल. मात्र अनोंदीत कंत्राटदारांचा धंदा १ डिसेंबर १९९८ नंतर देखील चालू असेल तर त्या कंत्राटदारांना ३१ मार्च १९९९ पूर्वी नोंदणी करून घ्यावी लागेल व नोंदणी करून घेतली तरच अनोंदीत कालावधीसाठी योजनेचा लाभ मिळेल.

२) ज्या करदात्याला योजनेचा लाभ घ्यावयाचा आहे त्याला स्वतःची दिनांक ३१ मार्च १९९८ ला संपणाऱ्या वर्षापर्यंतची निर्धारणा (नोंदीत आणि अनोंदीत कालावधीसाठी) दिनांक ३० जून १९९९ पूर्वी करून घ्यावी लागेल. योजनेच्या कालावधीमध्ये ज्यांची निर्धारणा याप्रमाणे पूर्ण होईल त्यांच करदात्यांना योजनेचा लाभ मिळेल.

३) योजनेप्रमाणे जी रक्कम भरण्याचे ठरेल, ती रक्कम योजनेच्या कालावधीमध्येच भरावी लागेल. १ डिसेंबर १९९८ रोजी वैधानिक आदेशाप्रमाणे जी थकबाकी असेल त्यासंबंधात योजनेप्रमाणे जी रक्कम भरावयाची, ती रक्कम २५ मार्च १९९८ पूर्वी भरली पाहिजे. अशी रक्कम ३१ डिसेंबर १९९८ पर्यंत भरली तर त्यावर व्याज लागणार नाही. मात्र अशी रक्कम त्यानंतर भरली तर त्या रकमेवर १ जानेवारी १९९९ नंतरच्या कालावधीसाठी दरमहा दरशेकडा २ टक्के दराने सरळ व्याज भरावे लागेल. योजना चालू झाल्यानंतर जी मागणी निर्धारणेप्रमाणे निर्माण होईल त्याबाबत योजनेप्रमाणे जी रक्कम भरावयाची ती निर्धारणा आदेश निर्गमित झाल्यापासून एक महिन्यात भरावी लागेल. परंतु कोणत्याही परिस्थितीत अशी रक्कम ३० जून १९९९ पूर्वी भरावी लागेल. आवश्यक वाटेल त्या प्रकरणात, रक्कम भरण्यासाठी विक्रीकर आयुक्त, हप्तेबंदीची सवलत देऊ शकतील. मात्र सर्व हप्ते योजनेच्या कालावधीतच भरावे लागतील. हप्तेबंदीने भरलेल्या रकमेवर देखील एक महिन्याचा कालावधी वगळून उर्वरित विलंबाकरिता दर महिना २ टक्के दराने सरळ व्याज भरावे लागेल.

४) लाभ घेऊ इच्छिणाऱ्या करदात्याने जर अपील दाखल केले असेल तर ते अपील विना अट मागे घेतले पाहिजे. योजनेखाली लाभ घेतल्यानंतर त्या कालावधीतील देय रकमेसाठी कोणताही कायदेशीर वाद घालता येणार नाही. असा वाद जर करदात्याने उत्पन्न केला तर योजनेखाली मिळालेली सवलत रद्द करण्यात येईल.

५) परिच्छेद ४(अ)(१) मध्ये उल्लेख केलेली राज्य शासनाच्या विभागांनी जी प्रत्यक्षपणे कंत्राटे दिली असतील त्यांच्यावर वरील सर्व कालावधी करता पूर्ण करमाफी तसेच व्याज व शास्ती माफी मिळेल. मात्र जेथे कंत्राटदारांनी राज्य शासनाकडून कर गोळा केला असेल किंवा कर भरण्यासाठी कंत्राटी रकमेवर आधिक्य घेतले असेल अशा प्रकरणात योजनेखाली कोणतीही सवलत मिळणार नाही. योजनेप्रमाणे माफी मिळावयाची असेल तर माफी मिळवू इच्छिणाऱ्या कंत्राटदारांनी कंत्राट देणाऱ्या अधिकाऱ्याकडून एक प्रमाणपत्र आणले पाहिजे. प्रमाणपत्रात असे नमूद केले असले पाहिजे की,- १) मूळ कंत्राटाप्रमाणे कार्यकंत्राट कर वेगळा देण्याची तरतूद नव्हती, तसेच,- २) मूळ कंत्राटामध्ये कंत्राटाच्या किंमतीत कार्यकंत्राट कराच्या रकमेचा अंतर्भाव आहे असा स्पष्ट उल्लेख नाही. ३) कंत्राट दिल्यापासून कंत्राटाच्या कालावधीत किंवा त्यानंतर कार्यकंत्राट कराच्या प्रयोजनार्थ कोणतीही रक्कम शासनातर्फे देण्यात आलेली नाही व देण्यात येणार नाही. तसेच त्या विरुद्ध कोणतेही आधिक्य शासनातर्फे मंजूर केलेले नाही व यापुढे मंजूर केले जाणार नाही.

मात्र, केंद्र शासनाने दिलेल्या कंत्राटाकरिता तसेच केंद्र व राज्य शासनाच्या मंडळांनी / महामंडळांनी, अंगीकृत उपक्रमांनी, स्थानिक स्वराज्य संस्था, खाजगी संस्था व खाजगी व्यक्ती यांनी दिलेल्या कंत्राटांच्या बाबतीत या उप-परिच्छेदातील उपरोक्त करमाफीची सवलत पूर्णपणे किंवा अंशतः मिळणार नाही.

६) अ) ज्या करदात्यांनी कर स्वतंत्रपणे गोळा केला आहे त्या करदात्यांना या योजनेखाली कोणतीही (करविषयक अथवा शास्ती, व्याज विषयक) सवलत मिळणार नाही.

ब) मूळ कंत्राटामध्ये कंत्राटाच्या किंमतीतच कराच्या रकमेचा अंतर्भाव केला असेल व त्याप्रमाणे उल्लेख केला असेल तर करदात्याला या योजनेखाली करविषयक सवलत मिळणार नाही. मात्र इतर अटी व शर्ती पूर्ण केल्या असल्या तर व्याज व शास्तीविषयक सवलती मिळतील. या उपपरिच्छेदाप्रमाणे मिळणारी सवलत राज्य शासनाने प्रत्यक्ष दिलेली कंत्राटे धरून सर्व प्रकारच्या कंत्राटाकरिता मिळेल.

क) मूळ कंत्राटामध्ये कंत्राटाच्या किंमतीत कराचा समावेश असल्याबद्दल काहीही उल्लेख नसला व करदात्याने कर स्वतंत्रपणे गोळा केला नसला तर, या योजनेखालील इतर अटी व शर्ती पूर्ण केल्यास योजनेखालील करविषयक व व्याज व शास्तीविषयक लाभ मिळेल.

४) योजनेखाली कार्यकंत्राट व्यवहारांचा उल्लेख करून ज्या अटी व शर्ती विहित केल्या आहेत त्या योग्य व आवश्यक त्या फेरफारासह भाडे करारावरील व्यवहारांना देखील लागू होतील.

८) अ) कार्यकंत्राट कर अधिनियमाच्या बाबतीत कोणत्याही विविक्षित कालावधीसाठी भरण्यासाठी म्हणून जी कराची, तसेच व्याजाची रक्कम विहित केली आहे ती योजनेप्रमाणे भरली तरच त्या कालावधीसाठी उर्वरित कर, शास्ती व व्याज यांची माफी योजनेप्रमाणे मिळेल.

ब) भाडेकरार कर अधिनियमाच्या बाबतीत कोणत्याही विविक्षित कालावधीसाठी वैधानिक आदेशाप्रमाणे कराची जी रक्कम देय असेल ती आणि व्याजाची जी रक्कम योजनेप्रमाणे विहित केली असेल ती योजना काळात भरली तरच शास्ती व उर्वरित व्याज यांची माफी योजनेप्रमाणे मिळेल.

९) या योजनेमध्ये उल्लेख केलेली शास्ती व व्याज याचा अर्थ कार्यकंत्राटकर अधिनियम तसेच भाडेकरार कर अधिनियम या खाली मुंबई विक्रीकर अधिनियमाच्या कलम ३६ व ३७ च्या आधारे लावलेली कोणतीही शास्ती वा व्याज असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अविनाश भागवत

शासनाचे विशेष कार्यकारी अधिकारी.

प्रत:-

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१] महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई.
२] महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर.
३] संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, माझगाव, मुंबई-४०० ०१० [४० प्रती].
५] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६] निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७] महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मुंबई.
८] निवड नस्ती, कराधान-१.